परभणी जिल्ह्यातील परभणी तालुक्यातील चार योजनाबाह्य रस्त्यांचा ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१८/प्र.क्र.१३३/नियोजन-२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- ०२ नोव्हेंबर, २०१८.

पहावे :-१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांचे पत्र क्र.मुअऔ/का-१४/प्रआ/रवियो-०१-२१/३८६१ दि. ०९/०८/२०१८.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांचेकडून संदर्भाधीन पत्रान्वये परभणी जिल्ह्यातील परभणी तालुक्यातील चार रस्त्यांचा ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करण्याबाबत प्रस्ताव शासनास प्राप्त झाला आहे.

सदर रस्ते दळणवळण व वाहतुकीच्या दृष्टीने महत्त्वाचे आहेत. सदर रस्ते मातीचे रस्ते असून यासाठी भूसंपादनाची आवश्यकता नाही. तसेच रस्ते रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करण्याबाबत जिल्हा परिषद, परभणी यांची मागणी आहे. त्यामुळे उपरोक्त रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये ग्रामीण मार्ग म्हणून समाविष्ट करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, परभणी यांची मागणी विचारात घेऊन, परभणी जिल्ह्यातील, परभणी तालुक्यातील खालील रस्ते रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये ग्रामीण मार्ग म्हणून समाविष्ट करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | योजनाबाह्य रस्त्याचे नाव | लांबी (कि.मी.) | प्रस्तावित नविन ग्रामीण मार्ग-क्रमांक |
|---|---|---|---|
| १. | ब्राम्हणगांव ते बाभळगांव ते ग्रामीण मार्ग-६५ ला मिळणारा रस्ता. | २.५०० | ग्रामीण मार्ग १३१ |
| २. | कौडगांव - ब्राम्हणगांव - तरोडा फाटी ते राज्यमार्ग-२४८ ला मिळणारा रस्ता. | ४.८०० | ग्रामीण मार्ग १३२ |
| ३. | ब्राम्हणगांव ते कौडगांव प्रमुख जिल्हा मार्ग-२५ पर्यंत रस्ता. | ३.५०० | ग्रामीण मार्ग १३३ |
| ४. | ब्राम्हणगांव ते नरसापूर -नागापूर ग्रामीण मार्ग-६६ ला मिळणारा रस्ता. | ३.६०० | ग्रामीण मार्ग १३४ |
| | **एकूण** | **१४.४०० कि.मी.** | |

परिणामी, परभणी जिल्ह्यातील **ग्रामीण मार्ग** रस्त्यांच्या एकूण लांबीत **१४.४०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (२८२९.२९० +१४.४००) म्हणजेच **२८४३.६९० कि.मी.** इतकी होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११०३१२००२१३८१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2018.11.03 12:08:37 +05'30'

**(प्रशांत पाटील)**

अवर सचिव (नियोजन),महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
२) उप सचिव,ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) विभागीय आयुक्त, औरंगाबाद.
४) अधिक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ,नांदेड (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
५) जिल्हाधिकारी, परभणी.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी.
७) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, परभणी
८) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
१०) निवडनस्ती.